NVHCP कार्यक्रमांतर्गत Hepatitis B व Hepatitis C च्या Rapid Kits आणि औषधे यांची दरनिश्चिती करुन त्याआधारे खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत.....

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१२२१/प्र.क्र.०४/आरोग्य-७

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : ३१ मार्च, २०२२

वाचा :-

(१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक : प्रशामा-१२२१/प्र.क्र. ०४/ आरोग्य-७, दिनांक : ०२ फेब्रुवारी, २०२१.

(२) सहसंचालक (रुग्णालये), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचे पत्र क्मांक : राआसो/ NVHCV/ किट्स व औषधी/प्रशासकीय मान्यता/१२२७९०/२०२२, दिनांक : ०३.०३.२०२२.

(३) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांची दिनांक १५.०२.२०२२ अन्वये मंजूर टिप्पणी.

(४) शासन पत्र, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक : प्रशामा-१२२१/प्र.क्र. ०४/आरोग्य-७, दिनांक : ०९ मार्च, २०२२.

(५) सहसंचालक (रुग्णालये), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचे पत्र क्मांक : राआसो/ NVHCV/ किट्स व औषधी/प्रशासकीय मान्यता/१३२६२३-६२६/२०२२, दिनांक : २३.०३.२०२२.

(६) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक : खरेदी-२०१६/प्र.क्र. २४०/आरोग्य-८, दिनांक : २६ जुलै, २०१७.

प्रस्तावना :-

संदर्भाधीन क्रमांक (१) च्या शासन निर्णयान्वये राज्यातील ३५ जिल्ह्यांमध्ये राष्ट्रीय व्हायरल हिपॅटायटीस नियंत्रण कार्यक्रमांतर्गत ९ आदर्श सुश्रुषा केंद्रे (Model Treatment Centers- MTC) व २७ सुश्रुषा केंद्रे (Treatment Centers- TC) येथे Hepatitis B व Hepatitis C च्या तपासणीसाठी Rapid Kits खरेदी करण्याच्या निविदा प्रक्रियेस सन २०२०-२१ या वर्षाकरीता प्रकल्प अंमलबजावणी आराखडा PIP FMR Code ६.२.२३.२ व PIP FMR Code ६.२.२३.१ या अर्थशिर्षाखाली रुपये ८५.३० लक्ष इतक्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तद्नुषंगाने, सहसंचालक (रुग्णालये), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांनी संदर्भाधीन पत्र क्रमांक (२) अन्वये सन २०२१-२२

या वित्तीय वर्षाकरीता NVHCP कार्यक्रमांतर्गत Hepatitis B व C च्या Rapid Kits आणि औषधी व इंजेक्शन यांची दरनिश्चिती करुन त्याआधारे रुपये ३,४३,१९,५००/- व रुपये ३,७५,३५,०००/- अशा एकूण रुपये ७,१८,५४,५००/- इतक्या खरेदीच्या अंदाजित खर्चास प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत विनंती केली आहे. तसेच, सदर प्रस्तावास आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी संदर्भाधीन क्रमांक (३) च्या टिप्पणीन्वये मंजूरी दिली आहे.

तथापि, शासनाच्या संदर्भाधीन पत्र क्रमांक (४) अन्वये आरोग्य सेवा आयुक्तालयाने Hepatitis B व C च्या Rapid Kits आणि औषधी व इंजेक्शन खरेदीसाठी केलेली दरनिश्चिती याबाबतची खातरजमा करण्यास कळविण्यात आले होते. याबाबत, आरोग्य सेवा आयुक्तालयाने संदर्भाधीन क्रमांक (५) च्या पत्रान्वये विषयाधीन खरेदीबाबतची दरनिश्चिती ही हाफकिन जीव-औषध निर्माण महामंडळाने दिलेल्या दराच्या आधारे व वाजवी असल्याचे कळविले आहे. तद्संबंधीच्या पृष्ट्यर्थ आरोग्य सेवा आयुक्तालयाने कागदपत्रे शासनास सादर केली असल्याने, विषयाधीन प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आरोग्य सेवा आयुकतालयाने सादर केलेल्या प्रस्तावानुसार National Viral Hepatatis Program (NVHCP) या कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ करीता Hepatitis B व C च्या Rapid Kits च्या खरेदीसाठी हाफकिन जीव-औषध निर्माण महामंडळ, मुंबई यांनी केलेल्या दरनिश्चितीनुसार अंदाजित प्रस्तावित खरेदीचा तपशिल पुढीलप्रमाणे आहे :-

**"प्रस्तावित खरेदीचा तपशील"**

| Table I.. Rapid Kits Budget Requirement (Apporox.) | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **Sr. No.** | **Name of Rapid Kit** | **Rate per Kit (In Rs.)** | **Quantity (No. of test/Kit)** | | **Budget Required (In Rs.)** | | **Total Budget Required for 2 Years (In Rs.)** |
| | | | **1st Year** | **2nd Year** | **1st Year** | **2nd Year** | |
| 1 | Hepatitis B Rapid Kit (Serum/Plasma bases) | 12 | 8,19,000 | 8,19,000 | 98,28,000 | 98,28,000 | 1,96,56,000 |
| 2 | Hepatitis B Rapid Kt (Whole blood) | 20 | 91,000 | 91,000 | 18,20,000 | 18,20,000 | 36,40,000 |
| 3 | Hepatitis B ELISA Kit (96 tests) | 1,000 | 1,000 Kit | 1,000 Kit | 10,00,000 | 10,00,000 | 20,00,000 |
| 4 | Hepatitis C Rapid Kit (Serum/Plasma bases) | 15 | 2,46,150 | 2,46,150 | 36,24,750 | 36,24,750 | 72,49,500 |
| 5 | Hepatitis C Rapid Kit (Whole blood) | 20 | 26,850 | 26,850 | 5,37,000 | 5,37,000 | 10,74,000 |
| 6 | Hapatitis C ELISA Kit (96 tests) | 1,000 | 350 Kit | 350 Kit | 3,50,000 | 3,50,000 | 7,00,000 |
| **Total…** | | | | | **17159750** | **1,71,59,750** | **3,43,19,500** |

वरील प्रमाणे Hepatitis B व C च्या Rapid Kits च्या खरेदीसाठी हाफकिन जीव-औषध निर्माण महामंडळाने केलेल्या दरनिश्चितीनुसार "PIP FMR Code ६.२.२३.२" या अर्थशिर्षाखाली उपलब्ध अनुदानातून रुपये ३,४३,१९,५००/- (रुपये तीन कोटी त्रेचाळीस लक्ष एकोणीस व हजार पाचसे फक्त) इतक्या प्रस्तावित अंदाजित खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

तसेच, आरोग्य सेवा आयुकतालयाने सादर केलेल्या प्रस्तावानुसार NVHCP कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ करीता Hepatitis B व C च्या औषधी व इंजेक्शन खरेदीसाठी हाफकिन जीव-औषध निर्माण महामंडळ, मुबई यांनी केलेल्या दरनिश्चितीनुसार अंदाजित प्रस्तावित खरेदीचा तपशिल पुढीलप्रमाणे आहे :-

## "प्रस्तावित खरेदीचा तपशिल"

**Table II.. NVHCP Medicine Budget Requirement (Apporox.)**

| Sr. No. | Name of Medicine | Rate per Tab/ Inj (In Rs.) | Quantity | | Budget Required (In Rs.) | | Total Budget Required for 2 Years (In Rs.) |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | 1st Year | 2nd Year | 1st Year | 2nd Year | |
| **Hepatitis B Medicine** | | | | | | | |
| 1 | Tab Entecavir (Ent 0.5 mg) | 11 | 40,000 | 40,000 | 4,40,000 | 4,40,000 | 8,80,000 |
| 2 | Tab Entercavie (Ent 1 mg) | 13 | 10,000 | 10,000 | 1,30,000 | 1,30,000 | 2,60,000 |
| 3 | Tab Tenofovir 300 mg | 7 | 40,000 | 40,000 | 2,80,000 | 2,80,000 | 5,60,000 |
| **Hepatitis C Medicine** | | | | | | | |
| 4 | Tab Daclatasvir 30 mg | 9 | 9,000 | 9,000 | 81,000 | 81,000 | 1,62,000 |
| 5 | Tab Daclatasvir 60 mg | 9 | 13,500 | 13,500 | 1,21,500 | 1,21,500 | 2,43,000 |
| 6 | Tab Sofosbuvir 400 mg | 22 | 9,000 | 9,000 | 1,98,000 | 1,98,000 | 3,96,000 |
| 7 | Tab Sofosbuvir 400 mg + Velpatasvir 100 mg | 75 | 54,000 | 54,000 | 40,50,000 | 40,50,000 | 81,00,000 |
| 8 | Tab Ribavirin 200 mg for Hepatitis C complicated cases | 6 | 4,500 | 4,500 | 27,000 | 27,000 | 54,000 |
| **Prophylaxis** | | | | | | | |
| 9 | Inj HBIG | 1,920 | 7,000 | 7,000 | 1,34,40,000 | 1,34,40,000 | 2,68,80,000 |
| **Total…** | | | | | **1,87,67,500** | **1,87,67,500** | **3,75,35,000** |

वरील प्रमाणे Hepatitis B व C च्या औषधी व इंजेक्शान खरेदीसाठी हाफकिन जीव-औषध निर्माण महामंडळाने केलेल्या दरनिश्चितीनुसार "PIP FMR Code ६.२.२३.१" या अर्थशिर्षाखाली उपलब्ध अनुदानातून रुपये ३,७५,३५,०००/- (रुपये तीन कोटी पंच्याहत्तर लक्ष पस्तीस हजार फक्त) इतक्या प्रस्तावित अंदाजित खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

सदर प्रकरणी, सन २०२१-२२ या वित्तीय वर्षाकरीता NVHCP कार्यक्रमांतर्गत Hepatitis B व C च्या Rapid Kits आणि औषधी व इंजेक्शन खरेदीसाठी अनुक्रमे रुपये ३,४३,१९,५००/- (रुपये तीन कोटी त्रेचाळीस लक्ष एकोणीस व हजार पाचसे फक्त) व रुपये ३,७५,३५,०००/- (रुपये तीन कोटी

पंच्याहत्तर लक्ष पस्तीस हजार फक्त) अशा एकूण रुपये ७,१८,५४,५००/- (रुपये सात कोटी अठरा लक्ष चौपन्न हजार पाचशे फक्त) इतक्या अंदाजित प्रस्तावित खर्चास पुढील अटीं व शर्तींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

(१) सदर Rapid Kits, औषधी व इंजेक्शन खरेदीची आवश्यकता /मागणी याची शहानिशा / खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

(२) सदरहू Rapid Kits, औषधी व इंजेक्शन सामुग्रीचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती/अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत.

(३) खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. तद्संबंधी, पीआयपी मध्ये मंजूर असलेल्या बाबींच्या तांत्रिक विर्निदेशानुसार मागणीपत्र पाठविण्याची व प्रस्तावातील समाविष्ट असलेल्या बाबींची खरेदी करण्याची जबाबदारी ही संबंधीत कार्यक्रम प्रमुखांची राहिल.

(४) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

(५) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

(६) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व / पुरवठानंतर नमुना तपासणी (pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (specification) असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

(७) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि

वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

(८) सदरहू खरेदीसाठी होणारा खर्च प्रकल्प अंमलबजावणी आराखडा सन २०२१-२२ मधील PIP FMR Code ६.२.२३.२ व PIP FMR Code ६.२.२३.१ या अर्थशिर्षाखाली मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून अनुदानातून भागविण्यात यावा. तसेच, सदरची खरेदी प्रशासकीय मंजुरीच्या विहित कालावधीत पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी.

(९) तसेच, या बाबींच्या खरेदी द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

(१०) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

(११) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अ.क्र.४ नियम क्र. ७ समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

(१२) खरेदी प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत.

(१३) प्रक्रीया पूर्ण झाल्यानंतर, खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत. तसेच, सदर प्रकरणी शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक : खरेदी-२०१६/प्र.क्र. २४०/आरोग्य-८, दिनाक : २६ जुलै, २०१७ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

उपरोक्त अनुक्रमांक (१) ते (१३) येथे नमूद केलेल्या अटीं व शर्तीची पूर्तता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे, हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई, संचालक (आरोग्य सेवा), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई व कार्यक्रम प्रमुख यांची राहील.

०२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजूरी देण्यासाठी प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. त्यानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

०३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३३०२२०३३०४६१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO

Digitally signed by LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=047af7706d4845170e3864b62c8bc6b380c78f11ce6607746c0b15e934fc8284, pseudonym=91CF303CCF98AAFBC28FD87C6A71DA717A6A7250, serialNumber=8902AEDC74F3CACF3FB967FF5955AAF5DCBFDD2C053872C04B5E4671EF77EC30, cn=LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
Date: 2022.04.04 12:51:42 +05'30'

( वि. ल. लहाने )
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

(१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
(२) अतिरिक्त अभियान संचालक, राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान, मुंबई.
(३) सहसंचालक (रुग्णालये),आरोग्य सेवा, मुंबई.
(४) संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
(५) संचालक (१) व (२), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई व पुणे.
(६) सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), मुंबई.
(७) सर्व सह संचालक (आरोग्य सेवा संचालनालया मार्फत)
(८) सर्व सहसचिव/उपसचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग.
(९) उप संचालक, सर्व मंडळ कार्यालये.
(१०) सर्व जिल्हा शल्य चिकित्सक (FWB मार्फत)..
(११) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी (FWB मार्फत)..
(११) निवड नस्ती (आरोग्य-७), सार्वजनिक आरोग्य विभाग, नवीन मंत्रालय, मुंबई.